**आर्यांग्ल वैद्यक महाविद्यालय, सातारा सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाच्या लेखा परिक्षित अहवालावर आधारित आवर्ती अनुदानाचा अंतिम हप्ता मंजूर करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: आयुष-२०१८/प्र.क्र.११९/१८/आयु-२,**
गो.ते. रुग्णालय आवार, गो.ते.संकुल, ९ वा माळा, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ०६ डिसेंबर, २०१८

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक: एडीआर-२००२/सीआर-११६/०२/आयु-२ दि.०५/१२/२००३
२) शासन निर्णय क्रमांक: एडीआर-२००९/प्र.क्र.१९५/०९/आयु-२ दि.३०/०३/२०१०
३) संचालक आयुष यांचे क्र.आसुंमं/सहा.अनु/निअप्र/आवैमसा/२०१६-१७/आयु-७(४)/२०१८/४९८३, दि.१५ मार्च,२०१८.

**प्रस्तावना :**

आर्याग्ल वैद्यक महाविद्यालय,सातारा ही संस्था खाजगी शासन अनुदानित आयुर्वेद संस्था असून आयुर्वेद प्रसारक मंडळी,पुणे या जनक संस्थेमार्फत चालविण्यात येत आहे. सदर महाविद्यालयात भारतीय चिकित्सा केंद्रिय परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेला साडे पाच वर्षांचा बी.ए.एम.एस.(आयुर्वेदाचार्य) हा पदवी अभ्यासक्रम शिकविण्यात येत असून महाविद्यालयाची प्रवेश क्षमता ५० इतकी आहे आणि महाविद्यालयाशी संलग्नित रुग्णालयाची मंजूर रुग्णशय्या १२० इतकी आहे.

सन २००३-०४ या वित्तीय वर्षात शासनाने माहे जानेवारी, २००४ पासून राज्यातील खाजगी शासन अनुदानित आयुर्वेद व युनानी संस्थांना १०० टक्के वेतनासाठी अनुदान मंजूर करण्याबाबत निर्णय घेतला आहे. त्याअनुषंगाने, आर्याग्ल वैद्यक महाविद्यालय,सातारा या संस्थेस सन २००७-०८ ते २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या लेखा परिक्षित अहवालावर रु. १,९९,२०७/- इतके आवर्ती अनुदान देय होत आहे. त्यानुसार सदर संस्थेस अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणा-या व शासनाकडून शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या वेतन खर्चासाठी सहाय्यक अनुदान देण्यात येणा-या अनुदान प्राप्त आयुर्वेद व युनानी महाविद्यालये व संलग्न रुग्णालये यांना शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक एडीआर-मुमंस/२००२/प्र.क्र.११६/०२/आयु-२, दिनांक ०५/१२/२००३ नुसार जानेवारी, २००४ पासून १००% वेतनाची रक्कम अनुदानार्ह करण्यात आली आहे. त्यानुसार खाजगी शासन अनुदानित आर्याग्ल वैद्यक महाविद्यालय,सातारा या संस्थेचे सन २००७-०८ ते २०१६-२०१७ या वर्षांचे अंतिम हप्त्याचे अनुदान निर्धारण पूर्ण होऊन सन २०१६-२०१७ च्या अंतिम हप्त्याच्या स्वरुपात देय अनुदान रु. १,९९,२०७/- (रुपये एक लाख नव्याण्णव हजार दोनशे सात फक्त) एवढ्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

सदर प्रस्तावावर होणारा खर्च रु. १,९९,२०७/- (रुपये एक लाख नव्याण्णव हजार दोनशे सात फक्त) सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर केलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा व सदर खर्च खालील लेखाशीर्षाखाली टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०२ - नागरी आरोग्य सेवा - इतर वैद्यक पद्धती

१०१ - आयुर्वेदिक

(०४) (०१) - आयुर्वेदिक व युनानी संस्थांकरीता सहाय्यक अनुदाने, अंशदाने, देणगी इ.

(३६) - सहाय्यक अनुदान (वेतन) (२२१० १९५७)

सदर रक्कमेच्या आहरण व संवितरण यासाठी सहाय्यक संचालक,आयुर्वेद, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

शासन निर्णय दि.४/९/१९७८ मधील तरतुदीनुसार लेखा परिक्षण अहवाल विहित वेळेत प्राप्त होणे बंधनकारक आहे. सदर लेखे परिक्षणाच्या अहवालानुसार वसुली / देय समायोजित करुन पहिल्या हप्त्याच्या पहिल्या महिन्याच्या वेतनाची अदायगी करण्यांत येईल याची नोंद घ्यावी.

शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक : विअप्र/१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम,दिनांक ११/०७/२००१ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग-एक, मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०१८१२१११७१००२१७१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by Dhananjay Mahesh Nayak
Date: 2018.12.11 17:13:24 +05'30'

**( ध.म.नायक )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, आयुष संचालनालय,मुंबई-४०० ००१.
२) महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ) १, महाराष्ट्र,मुंबई
३) वित्त विभाग ( व्यय-१३ )/( अर्थ-८ ), मंत्रालय,मुंबई.
४) सहाय्यक संचालक आयुष, नवी मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जि.सातारा.
६) कक्ष अधिकारी ( अलेप ), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,मुंबई
७) निवडनस्ती, आयु-२